**वैध मापन शास्त्र यंत्रणे अंतर्गत उप नियंत्रक गट-अ (राजपत्रित) या पदावर तात्पुरती पदोन्नती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक - वैमाशा-२०१९/३१४/प्र. क्र.९६/ग्रासं-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - ०८/०५/२०२०

**शासन आदेश:-**

सन २०१९-२० या निवडसूची वर्षात वैध मापन शास्त्र यंत्रणेतील खालील सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र, गट ब राजपत्रित वेतनश्रेणी-S-१५-(रू. ४१८००-१३२३००) यांना उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, गट अ, राजपत्रित - वेतनश्रेणी S-२०- (रू. ५६१००-१७७५००) पदावर या आदेशाद्वारे विहित अटींच्या अधीनतेने निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच त्यांच्या नावासमोर स्तंभ -५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | प्रवर्ग | सध्याची पदस्थापना | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री. नरेंद्रसिंह मोहनसिंह | विजा अ | सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र, कोल्हापूर | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, अमरावती विभागीय कार्यालय |

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा. उच्च न्यायालयाच्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. खुल्या प्रवर्गातील कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्यास कोणतीही वैधानिक अडचण नसल्याचे अभिप्राय विधी व न्याय विभागाने दि.२८.१२.२०१७ रोजी दिले आहेत. त्यानुसार तूर्तास पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावीत. अशी कार्यवाही करताना सेवाज्येष्ठता यादीमधील मागासवर्गीय अधिकारी/ कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते दि.२५.०५.२००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत, याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करावी अशा सूचना सा.प्र.वि./ का.१६-ब ने दि.२९.१२.२०१७ च्या पत्रान्वये दिल्या आहेत. त्यानुसार मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधीन राहून तसेच पुढील अटीच्या अधीन राहून संबंधीत सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांना उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र या संवर्गात खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यात येत आहे:-

१) सदरची पदोन्नती ही प्रशासकीय निकड म्हणून तात्पुरत्या स्वरूपातील पदोन्नती राहील.

२) सदर पदोन्नती, सद्य:स्थितीत सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र या पदाच्या ज्येष्ठता यादीबाबत कोणतेही न्यायालयीन प्रकरण प्रलंबित नाही, तसेच या ज्येष्ठता यादीस आव्हानित देखील करण्यात आलेले नाही ही वस्तुस्थिती विचारात घेऊन केवळ तात्पुरत्या स्वरूपात देण्यात येत आहेत.

३) सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरूपात असून सदर पदावर संबंधीत अधिकाऱ्यांचा कायमस्वरूपी धारणाधिकार राहणार नाही.

४) सन २०१९-२० या निवडसूची वर्षाकरीता पात्र सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांची निवडसूची तात्पुरत्या स्वरूपाची असून उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र पदावरील पदोन्नती ही तात्पुरत्या स्वरूपाची आहे. परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यास नियमित पदाचा व सेवा ज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

५) सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरूपाची असून ती केवळ पदोन्नत कोट्यात उपलब्ध होणाऱ्या पदांनुसार नियमित करण्यात येतील.

६) संबंधीत सहायक नियंत्रक,वैध मापन शास्त्र यांनी उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र पदावरील तात्पुरती पदोन्नती न स्वीकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.३०३/ का.१२, दि.१२.०९.२०१६ अन्वये त्यांचे नाव सन २०१९-२० च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल व पुढील दोन वर्षी होणाऱ्या निवडसूच्यांमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत उप नियंत्रक पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

७) सदर अधिकाऱ्याची उप नियंत्रक पदावरील तात्पुरती पदोन्नती ही सदर अधिकाऱ्याविरूध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरू झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

८) हे आदेश तात्काळ अंमलात येतील. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्याला तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच पदोन्नत अधिकाऱ्याने पदस्थापना केलेल्या पदावर तात्काळ रूजू व्हावे. नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी कार्यमुक्ततेचे तसेच रूजू करून घेतल्याच्या आदेशाच्या प्रती शासनास पाठवाव्यात.

३. दरम्यान, पदोन्नतीमधील आरक्षणाबाबत राज्य शासनाने दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ व इतर राज्यांच्या याचिकेबाबत मा.सर्वोच्च न्यायालयाने दि.१५.०४.२०१९ रोजी पुढीलप्रमाणे आदेश पारीत केले आहेत. “Until further orders status quo, as it exists today, shall be maintained” याबाबत सा.प्र.वि./कार्यासन १६- ब यांनी पुढील प्रमाणे अभिप्राय दिले आहेत. “दि.१५.०४.२०१९ रोजी व आत्ताही या कार्यासनानच्या दि.२९.१२.२०१७ च्या पत्रातील सूचना अस्तित्वात आहेत. सबब, पुढील आदेश होईपर्यंत सर्व पदोन्नत्यांबाबत या कार्यासनाच्या दि.२९.१२.२०१७ च्या पत्रातील सूचनांनुसार कार्यवाही करण्यात

यावी." सबब, सदर आदेशातील पदोन्नत्या शासन पत्र दि. २९.१२.२०१७ मधील सूचनांनुसार केवळ तात्पुरत्या स्वरूपात व सा.प्र.वि./कार्यासन १६- ब यांनी दिलेल्या उपरोक्त अभिप्रायानुसार देण्यात येत आहेत.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२००५०८१२४१०४१८०६ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHESHRAO BHASKAR KUTE

Digitally signed by SHESHRAO BHASKAR KUTE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b83dd3164bf1a6f2c48a39007e78789c79c52e07ad200c3250d381947c40582e, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=b9e0c912bdfbc8224f1554ba0bc93342824e4faa118ed64c79ac40826e1611b3, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SHESHRAO BHASKAR KUTE
Date: 2020.05.08 12:45:00 +05'30'

**( शे. भा. कुटे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) श्री. नरेंद्रसिंह मोहनसिंह, सहायक नियंत्रक, वैधमापन शास्त्र, कोल्हापूर
२) (नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांच्यामार्फत)

**प्रत :-**

१. नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, पुणे विभाग
३. महालेखापाल -१ ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. महालेखापाल -१ ( लेखा परिक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती / कोल्हापूर
७. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,
८. निवड नस्ती, कार्यासन ग्रासं-३.